**१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या अतिरिक्त न्यायालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत ..**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३१८/प्र.क्र.५७/का-नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- १५ मार्च, २०२३

संदर्भ:-१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.विशेन्या-१३१६/प्र.क्र.२०५/का-९,दि.१८.०८.२०१७.
२) जिल्हा व सत्र न्यायालय, ठाणे, वाशीम, नांदेड, रायगड-अलिबाग यांची विविध दिनांकाची पत्रे
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत ५ वर्षांच्या कालावधीकरीता एकूण १८ अतिरिक्त न्यायालये स्थापन करण्यात आली असून, या १८ अतिरिक्त न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. या १८ अतिरिक्त न्यायालयासाठीच्या अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. त्यानुसार संबंधित जिल्हा व सत्र न्यायालयांकडून शासनास प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. संदर्भीय अ.क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत.

तथापि, उपरोक्त १८ न्यायालयांपैकी, १२ न्यायालयांचा ५ वर्षांचा कालावधी दि.२८.०२.२०२३ रोजी/पूर्वी संपुष्टात आला आहे. त्यानुसार सदर १२ अतिरिक्त न्यायालये वगळून उर्वरीत ६ अतिरिक्त न्यायालयांसाठीच्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयांपैकी अचलपूर (जिल्हा, अमरावती), नांदेड, पुणे, मोटर वाहन अपघात दावा प्राधिकरण, ठाणे, मोटर वाहन अपघात दावा प्राधिकरण, ठाणे व मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई येथील ६ अतिरिक्त न्यायालयांसाठीच्या पुढील अस्थायी पदांना **दि.०१.०३.२०२३ पासून दि.३१.०८.२०२३ पर्यंत अथवा सदर न्यायालयांचा ५ वर्षांचा कालावधी पूर्ण होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरीता मुदतवाढ** देण्यात येत आहे.

| अ. | जिल्हा न्यायाधीश संवर्ग | | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) संवर्ग | |
|---|---|---|---|---|
| क्र. | पदनाम | पदसंख्या | पदनाम | पदसंख्या |
| १ | जिल्हा न्यायाधीश | ४ | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) | २ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ४ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | २ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | ४ | वरिष्ठ लिपिक | २ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ४ | कनिष्ठ लिपिक | २ |
| ५ | शिपाई | ४ | शिपाई | २ |
| | **एकूण** | २० | **एकूण** | १० |
| | | **एकूण पदे : ३०** | | |

२. याकरीता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५-दिवाणी व सत्र न्यायालये (०७) अतिरिक्त न्यायालये (०७)(०१) अतिरिक्त न्यायालये (२०१४ ०५७५)", लेखाशीर्षाखालील संबंधित वर्षासाठी मंजुर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१५१२५०३३००१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d47140 0fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E 5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.15 12:54:33 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,
२) प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
३) मुख्य महानगर न्यायदंडाधिकारी, मुंबई
४) जिल्हा व सत्र न्यायालय, संबंधित जिल्हे
५) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
६) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे
१०) वित्त विभाग व्यय-५,
११) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
१२) निवड नस्ती- का.९.